रोजगार व स्वयंरोजगार यंत्रणेतील सहायक संचालक,
गट-अ, या पदावर तदर्थ पदोन्नती देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
रोजगार व स्वयंरोजगार विभाग,
शासन निर्णय क्रमांकःइएसई-२००६/प्र.क्र.६३/प्रशा-२,
नवीन प्रशासकीय भवन, १४ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : ३० डिसेंबर, २०११.

संदर्भ : रोजगार व स्वयंरोजगार विभाग, शासन निर्णय, समक्रमांक दिनांक २४/१०/२००८ व दिनांक २९/१२/२०११.

**शासन निर्णय :**

उपरोक्त संदर्भाधीन दिनांक २४/१०/२००८ च्या शासन निर्णयान्वये एकूण १३ रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिका-यांना सहायक संचालक, गट-अ या पदावर तदर्थ स्वरुपात पदोन्नती दिलेली होती. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून नामनिर्देशनाने उमेदवार उपलब्ध न झाल्याने प्रशासकीय हितास्तव व प्रशासकीय निकड लक्षात घेऊन सदर पदोन्नती ११ महिन्यांच्या कालावधीनंतर १ दिवसाचा तांत्रिक खंड देऊन संदर्भाधीन दिनांक २९/१२/२०११ च्या शासन निर्णयान्वये पुढील ११ महिन्यांकरिता चालू ठेवण्यात आली होती.

२. उपरोक्त एकूण १३ अधिका-यांपैकी श्री.र.श्री.पवार हया दिनांक ३०/११/२००९ रोजी स्वेच्छा सेवानिवृत्त आणि श्री.र.तु.सावरकर हे दिनांक ३०/०४/२०१० रोजी सेवानिवृत्त झाले आहेत. सहायक संचालक, गट-अ या संवर्गातील रिक्त पदांवर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून नामनिर्देशनाने उमेदवार उपलब्ध न झाल्याने प्रशासकीय हितास्तव व प्रशासकीय निकड लक्षात घेऊन उर्वरित ११ रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिका-यांना सहायक संचालक, गट-अ वेतनश्रेणी (पूर्वीची रु.७४५०-११५००) ६ व्या आयोगातील वेतनश्रेणी ९३००-३४८००, ग्रेड पे ४६०० या पदावर १ दिवसाचा तांत्रिक खंड देऊन सहायक संचालक या पदावर दिलेली तदर्थ पदोन्नती पुढील ११ महिन्यांपर्यंत पुढे चालू ठेवण्यास पूर्वलक्षी प्रभावाने मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार, सदर अधिका-यांच्या तात्पुरत्या पदोन्नतीचा कालावधी खालीलप्रमाणे राहील :-

| अ. क्र. | अधिका-यांचे नाव | तांत्रिक खंडाचा दिनांक | तदर्थ पदोन्नतीचा कालावधी |
|---|---|---|---|
| १ | श्रीमती छा.अ.कुबल | ०६/०९/२०१० | दि. ०७/०९/२०१० ते दि. ०६/०८/२०११ |
| २ | श्रीमती क.ह.जावळे | १२/०९/२०१० (रविवार) १३/०९/२०१० | दि. १४/०९/२०१० ते दि. १३/०८/२०११ |
| ३ | श्री.गु.वा.इंगळे | ०५/०९/२०१० (रविवार) ०६/०९/२०१० | दि. ०७/०९/२०१० ते दि. ०६/०८/२०११ |

| अ. क्र. | अधिका-यांचे नाव | तांत्रिक खंडाचा दिनांक | तदर्थ पदोन्नतीचा कालावधी |
|---|---|---|---|
| ४ | श्री.प्र.द.येवले | ०६/०९/२०१० | दि. ०७/०९/२०१० ते दि. ०६/०५/२०११ निधन |
| ५ | श्री.म.नि.धाकड | ०२/०९/२०१० | दि. ०३/०९/२०१० ते दि. ०२/०८/२०११ |
| ६ | श्री.वि.जा.मुकणे | १५/०९/२०१० | दि. १६/०९/२०१० ते दि. १५/०८/२०११ |
| ७ | श्री.न.ह.नलावडे | ०८/०९/२०१० | दि.०९/०९/२०१० ते दि.०८/०८/२०११ |
| ८ | श्री.भै.गो.येरमे | ०२/०९/२०१० | दि. ०३/०९/२०१० ते दि. ०२/०८/२०११ |
| ९ | श्री.ओ.शं.जाधव | ०२/०९/२०१० | दि. ०३/०९/२०१० ते दि. ०२/०८/२०११ |
| १० | श्री.व्हि.के.माळी | १६/०९/२०१० | दि. १७/०९/२०१० ते दि. १६/०८/२०११ |
| ११ | श्री.सं.पा.चाटे | ०२/०९/२०१० | दि. ०३/०९/२०१० ते दि. ०२/०८/२०११ |

३. वरील अधिका-यांच्या तदर्थ पदोन्नत्या या ११ महिने वा महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध होईपर्यंत वा संबंधित अधिकारी सेवानिवृत्त होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत सुरु राहतील आणि महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून उमेदवार उपलब्ध झाल्यानंतर सदर तदर्थ पदोन्नती दिलेल्या अधिका-यांना पदावनत करण्यात येईल.

४. सदर पदोन्नतीच्या आधारे त्यांना नियमित पदोन्नतीचे, ज्येष्ठतेचे किंवा आणखी कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

५. उपरोक्त पदोन्नत्या मा.उच्च न्यायालयामधील याचिका क्र.८४५२/२००४ मधील न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून असतील.

६. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.-२६०/सस-१२, दिनांक १७ डिसेंबर, २०११ अन्वये मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(वि.रा.शिरसाट)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई,
सर्व उप संचालक, रोजगार व स्वयंरोजगार, विभागीय मुख्यालये, मुंबई/नाशिक/पुणे/औरंगाबाद /अमरावती/नागपूर,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),
सर्व संबंधित अधिकारी,

सर्व सहायक संचालक, जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र/विद्यापीठ रोजगार व स्वयंरोजगार माहिती व मार्गदर्शन केंद्र/अपंगार्थ विशेष रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र,
रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी, (तांत्रिक),मुंबई/पिंपरी, पुणे,
रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी, आदिवासी उमेदवारांसाठी प्रशिक्षण व मार्गदर्शन केंद्र, मंचर, जि.पुणे/किनवट,नांदेड/अचलपूर,अमरावती/देवरी, गोंदिया/चंद्रपूर/गडचिरोली
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर,
महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
जिल्हा कोषागार अधिकारी,ठाणे,पुणे,वाशिम,बुलढाणा,अमरावती,कोल्हापूर,धुळे,सोलापूर,सातारा, अकोला,सांगली,गडचिरोली,औरंगाबाद,सिंधुदुर्ग,जळगाव नाशिक,नंदुरबार,
अपर कोषागार अधिकारी, उप कोषागार कार्यालय, नवी मुंबई,
सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन १२/१६,मंत्रालय, मुंबई,
निवडनस्ती.नस्ती.